सन २००८ च्या अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून ऊर्जा निर्मिती धोरणाच्या अनुषंगाने निश्चित सन २०१० च्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, उर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्रमांकः पवन-२०२१/प्र.क्र.६७/ऊर्जा-७.
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १० जानेवारी, २०२२.

वाचा :

१. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३/उर्जा-७, दि.१४.१०.२००८.
२. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.पवन-२०१०/प्र.क्र.१३४/उर्जा-७, दि.१४.०७.२०१०.

शासन निर्णयः-

अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतास प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शासनाने अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून ऊर्जा निर्मितीचे नवीन धोरण संदर्भांकित दिनांक १४.१०.२००८ च्या शासन निर्णयान्वये जाहीर केले आहे. सदर धोरणाप्रमाणे अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मिती प्रकल्प उभारणी विषयी उपरोक्त दिनांक १४.०७.२०१० अन्वये कार्यपध्दती जाहिर करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीमध्ये दिनांक १४.१०.२००८ च्या धोरणातंर्गत असलेल्या सोयी सवलतींचा लाभ घेण्यासाठी विकासक/प्रकल्पधारकांनी पवन ऊर्जा प्रकल्प उभारलेल्या जागेचे तालुका भूमिअभिलेख निरिक्षक यांचे मोजणीनुसार प्रमाणित केलेले नकाशे व त्यांच्या नावे ७/१२ उतारे महाऊर्जाला सादर करणे बंधनकारक राहील अशी अट घालण्यात आली आहे. त्यामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

१) निष्कासन व्यवस्थेतंर्गत उच्च दाब व अति उच्च दाब उपकेंद्रे उभारलेल्या जागेचा तालुका भूमि अभिलेख निरिक्षक यांचे मोजणीनुसार प्रमाणित केलेला नकाशा व महापारेषण/महावितरण यांच्या नावे ७/१२, मिळकत पत्रक सादर केल्यानंतरच या धोरणातंर्गत देय असलेला निष्कासन व्यवस्थेचा परतावा/सोयी सवलती देय राहतील.

२) उपरोक्त १) मध्ये नमूद निष्कासन व्यवस्थेव्यतिरिक्त पवन ऊर्जा प्रकल्प उभारलेल्या इतर जागेचे तालुका भूमि अभिलेख निरिक्षक यांचे मोजणीनुसार प्रमाणित केलेले नकाशे या धोरणातंर्गत सोयी सवलतींचा लाभ घेण्यासाठी विकासक/ प्रकल्पधारक यांनी महाऊर्जा, महापारेषण/महावितरण यांना सादर करणे बंधनकारक राहणार नाही.

३) तसेच निष्कासन व्यवस्थेचा खर्चाचा परतावा देण्यापूर्वी पवनऊर्जा प्रकल्प विकासक/ प्रकल्पधारक (पवनऊर्जा निर्माते) यांच्याकडून/ शेतकरी/ जमीनधारकांकडून भविष्यात काही वाद अथवा तक्रारी उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी प्रकल्पधारक/विकासक यांची राहील, अशा आशयाचा क्षतीपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond) अशा प्रकल्पधारक/विकासक यांचेकडून महाऊर्जा, महापारेषण/महावितरण यांनी घ्यावा.

२.	सदर शासन शासन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११०१७३७२४३११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.01.10 17:38:24 +05'30'

**(नानासाहेब ढाणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत नियामक, मुंबई (पत्राने)
२.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे.
३.प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४.सचिव, उप मुख्यमंत्र्यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
५.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६.अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.अपर मुख्य सचिव महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, नवि-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.खाजगी सचिव, मा.मंत्री (अपाऊ), मंत्रालय, मुंबई.
१६.खाजगी सचिव सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
१७.सर्व परवानाधारक कंपन्या.
१८.विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१९.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२०.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२२.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२३.उप सचिव (ऊर्जा-७), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५.निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.